**“मागणी क्रमांक झेडए-०२, २२०३ तंत्रशिक्षण,(०१) (०३) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे (राज्यस्तर) (२२०३ ३४६२) या लेखाशिर्षांतर्गत “५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानापैकी वितरीत निधी रुपये ७५.०० लक्ष (रू. पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: खरेदीप्र./२०२१/प्र.क्र.१५०/व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ:-** १. संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे क्र.१२/नियोजन/खरेदी/प्रमा/२०२१-२२/प्र.क्र.५०/२७९, दि.०१.१२.२०२१ व दि. २४.०१.२०२२
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दि.१७.०४.२०१५
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६,
४. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७,
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि. २४.०६.२०२१
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
७. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ/२०१९/प्र.क्र.२४३/प्रशा-१, दि.१९.११.२०१९

**प्रस्तावना :**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे या राज्य स्तरीय सर्वसाधारण योजनेस उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय दि. ०३ फेब्रुवारी २०११ अन्वये योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या करीता सन २०२१-२२ या वर्षात वरील लेखा शिर्षाखाली रू. १५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर तरतूदीच्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय प्रादेशिक कार्यालय जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळ कार्यालय या करीता संगणक, लॅपटॉप, मल्टीफंक्शन प्रिंटर, युपीएस ३ केव्हीए खरेदी करणे आवश्यक आहे. सदर खरेदी २०१७-१८ नंतर व २०२०-२१ पर्यंत करण्यात आलेली नाही यापूर्वी उपलब्ध असलेल्या संगणकाची आयुष्य ही पाच वर्ष मर्यादीत आहे, त्यामुळे ते वारंवार बंद पडून निकामी होत आहे. त्यामुळे कार्यालयीन कामकाज करताना अडचणी होत आहे. याकरिता सन २०२१-२२ या अर्थसंल्पित वर्षात रू. १५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंल्पीत झालेला असून या निधी पैकी रू. ७५.०० लक्ष इतक्या वितरीत निधीच्या मर्यादित खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षक यांनी संदर्भ क्र. १ व त्या सोबत जोडलेल्या परिशिष्टात प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार रू. ७५.०० लक्ष (रू. पंच्याहत्तर लक्ष फक्त) “५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री” या उद्दिष्टांतर्गत खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांच्या संदर्भ क्र.१ येथील दि. ०१.१२.२०२१ व दि. २१.०१.२०२२ च्या पत्रात व सोबतच्या परिशिष्टात नमूद केल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक झेडए-०२, २२०३ तंत्रशिक्षण, (०१) (०३) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे (राज्यस्तर)

(२२०३ ३४६२) या लेखाशिर्षांतर्गत “५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री” या उद्दिष्टातर्गंत रू. १५०.०० लक्ष इतक्या निधी अर्थसंल्पित झालेला असून सदर निधीपैकी वितरीत झालेला रू. ७५.०० लक्ष (रू. पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या मर्यादेत खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील येणारा खर्च मागणी क्रमांक झेडए-०२, २२०३ तंत्रशिक्षण, (०१) (०३) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे (राज्यस्तर) (२२०३ ३४६२) या लेखाशिर्षांतर्गत “५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखाशिर्षाखाली या उद्दिष्टाकरीता सन २०२१-२२ करिता मंजूर असलेल्या अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यात यावा. मात्र प्रत्यक्षात खर्च रू. ७५.०० लक्ष (रू. पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या वितरीत झालेल्या मर्यादेतच करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अनुसार वित्तीय अधिनियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. ३ नियम क्र. ७; अ.क्र.४, नियम क्र.७; अ.क्र.२६-अ नियम क्र.७६, अ.क्र.२७-अ नियम क्र.७६ व अ.क्र.२७-ब नियम क्र.७६ व अ.क्र.२८ नियम क्र.७६; अ.क्र.३७ नियम क्र.९० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच वित्त विभाग अनौ.सं.क्र. १९/व्यय-६ दि.०९.०२.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार तसेच संदर्भ क्र. ३, ४ व ७ येथील शासन निर्णयातील तरतूदीचे काटेकोर पालन करण्याच्या तसेच खालील अटी व शर्तींचा अधिन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:-

अ) सदरहू यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच प्रस्तावातील परिशिष्टात समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

ब) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५//उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७ आणि त्या विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णायान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील अटी व शर्ती आणि तरतूदीनुसार, काटेकोरपणे पालन करुन, विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच सदर शासन निर्णयानुसार व विभागाच्या संदर्भ क्र. ७ येथील शासन निर्णय दि.१९.११.२०१९ अन्वये गठित केलेल्या समितीच्या मान्यतेने कार्यवाही करण्यात यावी. सदर खरेदीची प्रक्रिया खरेदी धोरणानुसार राबविण्यात यावी.

क) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६, आणि उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५// उद्योग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७ अन्वये दिलेल्य अटींच्या व शर्तींच्या अनुषंगाने संस्थास्तरावरुन GEM च्या माध्यमातून साहित्य खरेदी प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदी देयके कोषागारातून आहरीत करु नयेत.

ड) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी खातरजमा करावी.

इ) खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

ई) सदरचा खर्च वितरीत असलेल्या रूपये ७५.०० लक्ष (रू. पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या निधीच्या मर्यादेत करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१०१७५०४७९५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2022.02.10 17:54:48 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय.
३. सर्व प्र.प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था.
४. सर्व अधिदान व लेखाअधिकारी.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग/व्यय-६
८. निवडनस्ती (व्यशि-४).